सन २०१८-१९, २०१९-२०, २०२०-२१ व २०२१-२२ या आर्थिक वर्षातील उत्कृष्ट निर्यातीची कामगिरी करणा-या राज्यातील निर्यातदारांसाठी आयोजित पुरस्कार वितरण सोहळा, एक जिल्हा एक उत्पादन प्रदर्शन कार्यक्रम व निर्यातदारांचे संमेलन याकरीताच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र.निर्यात- २०२३/ प्र.क्र.११८/ उद्योग-७**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक १८/०८/२०२३

संदर्भ :- १. उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय क्र. इएक्सपी-१००२/प्र.क्र.२२१/उद्योग-१२, दिनांक २०/०१/२००३.
२. अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.उसं/ निप्रशा/ प्रशासकीय मंजूरी/ २०२३/ अे-७९४, दिनांक २७/०६/२०२३.

**प्रस्तावना :-**

राज्यातील निर्यातदारांना मान्यता प्राप्त व्हावी व त्यांनी केलेल्या निर्यातीच्या कामगिरीबद्दल त्यांचे कौतुक व्हावे आणि भविष्यकाळात निर्यातदारांनी गतकालापेक्षा अधिक भरीव कामगिरी करुन जास्तीत जास्त निर्यात करावी. तसेच निर्यात प्रचालनास हातभार लावावा या हेतूने राज्यातील निर्यातदारांना त्यांच्या निर्यातीच्या उत्कृष्ट कामगिरीबद्दल सन्मानचिन्हे आणि गुणवत्ता प्रमाणपत्रे समारंभपूर्वक होणेबाबतची योजना सन १९७१-७२ पासून विकास आयुक्त (उद्योग) यांचेमार्फत राबविली जाते. राज्यातील लघू व मध्यम उद्योजकांना उत्कृष्ट निर्यातीचे कार्य करणा-या निर्यातदारांची पारितोषिकांसाठी निवड करण्यासाठी दिनांक २०/०१/२००३ रोजीच्या शासन निर्णयान्वये मा. प्रधान सचिव(उद्योग) यांचे अध्यक्षतेखाली निवड समिती गठीत करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने राज्यातील निर्यातदारांकडून विविध प्रवर्गातील निर्यात पुरस्कार योजनेसाठी सन २०१८-१९, २०१९-२०, २०२०-२१ व २०२१-२२ या वर्षाकरीता एकूण १५० अर्ज प्राप्त झाले असून छाननी अंती प्रथमदर्शनी एकूण १३९ अर्ज पात्र ठरले आहेत. मा. प्रधान सचिव (उद्योग व खनिकर्म) यांच्या अध्यक्षतेखालील दिनांक ०८/०५/२०२३ रोजी संपन्न निवड समितीच्या बैठकीत पात्र असलेल्या १३९ अर्जांपैकी वेगवेगळ्या प्रवर्गातील १२० निर्यात उद्योग घटकांची (प्रथम पुरस्कार-६६, द्वितीय पुरस्कार-३३ व उत्तेजनार्थ-२१) पुरस्काराकरीता निवड करण्यात आली आहे. त्याअनुषंगाने मुंबई येथे निर्यात पुरस्कार वितरण सोहळा, एक जिल्हा एक उत्पादन (ODOP) प्रदर्शन कार्यक्रम व निर्यातदारांचे संमेलन (Expo-Conference) हे दोन दिवसीय कार्यक्रम आयोजनाकरीता प्रशासकीय मंजूरी व निधी वितरण करण्याबाबतचा प्रस्ताव अतिरिक्त उद्योग संचालक, उद्योग संचालनालय यांनी त्यांच्या दिनांक २७/०६/२०२३ रोजीच्या पत्रान्वये सादर केला आहे. त्याअनुषंगाने सदर दोन दिवसीय कार्यक्रमाच्या खर्चास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०१८-१९, २०१९-२०, २०२०-२१ व २०२१-२२ या आर्थिक वर्षातील उत्कृष्ट निर्यातीची कामगिरी करणा-या राज्यातील निर्यातदारांसाठी मुंबई येथे आयोजित केल्या जाणा-या पुरस्कार वितरण सोहळा, एक जिल्हा एक उत्पादन प्रदर्शन कार्यक्रम व निर्यातदारांचे संमेलन याकरीता आवश्यक उद्योग संचालनालयाकडून सादर करण्यात आलेल्या पुढील विवरणपत्रात नमूद रुपये ६० लक्ष रकमेच्या प्रस्तावास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर कार्यक्रम व कार्यशाळा आयोजनासाठी उद्योग संचालनालय, मुंबई ही कार्यान्वयन यंत्रणा आहे.

| अ.क्र. | बाब | | अंदाजित खर्च (रुपये) |
|---|---|---|---|
| १. | पुरस्कार, सन्मानचिन्ह व प्रशस्तीपत्र खरेदी खर्च | | ४०,४६,३८८ |
| २. | प्रसिद्धी जाहिरात खर्च (प्रमुख इंग्रजी व मराठी वर्तमानपत्र) | | १०,१३,६१२ |
| ३. | समारंभ आयोजन खर्च (मुंबई) | अल्पोपहार, चहापान, आदरातीथ्य, सभागृह व्यासपीठ, बैठकव्यवस्था, एलईडी इत्यादी खर्च (महाराष्ट्र आकस्मिक खर्च नियम, १९६५ व वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, | ८,००,००० |

| | | | |
|---|---|---|---|
| | | भाग पहिला, उप विभाग दोन मधील अ.क्र.१० नियम क्रमांक ३१ अ(एक)) | |
| ४. | समारंभ निवेदिका मानधन | | ४०,००० |
| ५. | लॉजिस्टीक व इतर आकस्मिक खर्च (अंदाजे) | | १,००,००० |
| | | **एकूण** | **६०,००,०००/-** |

२. प्रस्तुत शासन निर्णय वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उप विभाग १ ते ५ प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकारातील सुधारणा संदर्भात वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/ प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम-भाग-२, दिनांक १७ एप्रिल, २०१५ मधील महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका अंतर्गत नियम २७(२) अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेले अधिकार, वित्त विभागाचे शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२३/ प्र.क्र.४०/ अर्थ-३, दिनांक १२/०४/२०२३ व त्यासोबतच्या परिशिष्टातील तरतुदीनुसार तसेच वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१५७/ २०२३/ व्यय-१६, दिनांक ०७/०८/२०२३ अन्वये दिलेल्या सहमतीनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आले असून त्याचा संकेतांक २०२३०८१८१४४२४३४५१० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

RAJEEV VITTHAL RAJMANE

Digitally signed by RAJEEV VITTHAL RAJMANE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY LABOUR AND MINING DEPARTMENT, 2.5.4.20=236eb645736d99439ecdba7a9ca089f1295797136f40d4172ad8740745981e39, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9AF1A1281C6D8847D249FEF2488B7CAA84A3751E6EE91EBAA5CC0332D8B30060, cn=RAJEEV VITTHAL RAJMANE
Date: 2024.01.04 16:32:22 +05'30'

**( राजीव राजमाने )**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) विकास आयुक्त(उद्योग), उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
२) महालेखापाल, महाराष्ट्र-१(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण), मुंबई.
३) महालेखापाल, महाराष्ट्र-२(लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षण) , नागपूर.
४) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
५) निवासी लेखा परीक्षण अधिकारी, मुंबई.
६) लेखाधिकारी, उद्योग संचालनालय, नवीन प्रशासकीय भवन, मुंबई-४०० ०३२.
७) वित्त विभाग (कार्यासन अर्थसंकल्प-१४/ व्यय-१६), मंत्रालय, मुंबई.
८) नियोजन विभाग (कार्यासन-१४६१), मंत्रालय, मुंबई.
९) अवर सचिव (कार्यासन प्रशासन-१), उद्योग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) निवडनस्ती (कार्यासन उद्योग-७).